**कामठी टेक्सटाईल निटींग अँड गारमेंट औद्योगिक सहकारी संस्था मर्या., कामठी, ता. कामठी, जि.नागपूर या संस्थेस नव्याने खरेदी केलेल्या जमीनीवर प्रकल्प उभारणीस मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. सपववि-३७०१३/२०/२०१४-DESKTEX-२**
१६ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १० एप्रिल, २०२३

**वाचा :**
१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक - यंत्रमाग १३९८/प्र.क्र.१५८/ टेक्स -२, दिनांक २४ फेब्रुवारी , १९९९.
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय, क्रमांक-यंत्रमाग १३०६/ प्र.क्र.१४१/ टेक्स -२ , दिनांक २२ जानेवारी, २००९.
३) राष्ट्रीय सहकारी विकास निगम यांचे पत्र क्रमांक - एनसीडीसी ५-२२/२०१३ एचएलएम ( पीएल )/ २६७/एसए ३०१८६,दिनांक ०३ फेब्रुवारी २०१४.
४) सहकार , पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र. यंत्रमाग -२००९/ प्र.क्र. ८८/टेक्स २, दि.३१ मार्च २०१८
५) आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांचे पत्र क्रमांक : - कार्या ४ / यंत्रमाग / ब-४३/७४९०/२०१९ दि.१८ सप्टेंबर २०१९.
६) आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांचे पत्र क्रमांक : - कार्या ४ / यंत्रमाग / ब-४३/१८९७/२०२१ दि.०७ एप्रिल २०२१.
७) आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांचे पत्र क्रमांक : - कार्या ४ / यंत्रमाग / प्र.क्र.८८/कामठी/जमीलबदली/३७०६/२०२२ दि.०५ जुलै २०२२.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त वाचा क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये कामठी टेक्सटाईल निटींग अँड गारमेंट औद्योगिक सहकारी संस्था मर्या., कामठी, ता. कामठी, जि.नागपूर या संस्थेस प्रथम हप्त्यापोटी शासकीय भागभांडवल व रा.स.वि.नि. कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आलेली आहे. आता वाचा क्र. ५ ते ७ अन्वये आयुक्त ( वस्त्रोद्योग ) यांनी सदर संस्थेस प्रकल्प उभारणीच्या दृष्टीकोनातून आवश्यक सोई सुविधा, बाजारपेठ, कामगार इ. सोयीनीयुक्त मौजा आजनी प.ह.नं. १९, ग्राम पंचायत आजनी, रा.नि. मंडळ कामठी, तह. कामठी, जि. नागपूर येथिल खसरा नं. ११५/२, आराजी ०.८१ हे. आर. पैकी ०.१० हे.आर या नव्याने खरेदी केलेल्या जमीनीवर प्रकल्प उभारणीस परवानगी देण्याबाबत विनंती केलेली आहे. त्यास अनुसरून कामठी टेक्सटाईल निटींग अँड गारमेंट औद्योगिक सहकारी संस्था मर्या., कामठी, ता. कामठी, जि.नागपूर या संस्थेने नव्याने खरेदी केलेल्या जमीनीवर प्रकल्प उभारणीस मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

कामठी टेक्सटाईल निटींग अँड गारमेंट औद्योगिक सहकारी संस्था मर्या., कामठी, ता. कामठी, जि.नागपूर या संस्थेस मौजा आजनी प.ह.नं. १९, ग्राम पंचायत आजनी, रा.नि. मंडळ कामठी, तह. कामठी, जि. नागपूर येथिल खसरा नं. ११५/२, आराजी ०.८१ हे. आर. पैकी ०.१० हे.आर या नव्याने खरेदी केलेल्या जमीनीवर प्रकल्प उभारणीस खालील अटींच्या अधिन राहुन मंजुरी देण्यात येत आहे.

१ ) रा.स.वि.नि. ने जमीन व जमीन विकासाकरीता मंजूर केलेल्या तरतूदीपेक्षा जादा होणारा खर्च संस्थेने स्वनिधीतुन भागविण्यात यावा.

२ ) संस्थेने यापुर्वी खरेदी केलेली जमिन विहित पध्दतीने ( ई - टेंडरिंग इ . ) विक्री करुन येणारी रक्कम संस्थेच्या Designated Account मध्ये जमा करण्यात यावी .

३) जमीन विक्री करुन येणारी रक्कम प्रकल्प खर्चा करीताच वापरण्यात यावी .

४) सदर संस्थेचा गारमेंट मॅन्युफॅक्चरिंग प्रकल्प नव्याने खरेदी केलेल्या जमिनीवर उभारणीकरिता लागणारी सर्व प्रमाणपत्रे व परवानग्या याबाबतची पूतर्ता आयुक्त (वस्त्रोद्योग) नागपूर यांनी करुन घ्यावी.

५) सदर जमीनीवर प्रकल्प उभारणीस अंतिम मंजुरी असून तद्नंतर संस्थेच्या अन्य जागेत प्रकल्प उभारणी करण्यास मंजूरी देण्यात येणार नाही.

६) या प्रकरणी वाचा क्र.१,२,३ व ४ मधील अटींची व इतर विहीत अटींची पूर्तता करून घेण्याची जबाबदारी आयुक्त (वस्त्रोद्योग) नागपूर यांची राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४१०१३२३०२१९०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAURI RAHUL MHASKE

Digitally signed by GAURI RAHUL MHASKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9e5721a987027f2e238034188d086bb44a9aa24eeb5b83735e1bbb433b57d4ef, pseudonym=9284505F9FF610F2FE668264BFDFCE42DDF9DA61, serialNumber=B018BA858DD6B20CC7A84F6BC86A86D6A6E9AC3AC56C5DBFCD89F36C74DE3E1F, cn=GAURI RAHUL MHASKE
Date: 2023.04.10 13:31:05 +05'30'

**( गौरी रा. म्हस्के )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री (वस्त्रोद्योग), यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई

२) सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

३) व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली.

४) विभागीय संचालक (पश्चिम) राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ५ बी जे रोड, पुणे.

५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

६) आयुक्त (वस्त्रोद्योग) वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर

७) प्रादेशिक उपआयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर.

८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर

९) चेअरमन, कामठी टेक्सटाईल निटींग अँड गारमेंट औद्योगिक सहकारी संस्था मर्या., कामठी, ता. कामठी, जि.नागपूर

१०) निवडनस्ती (टेक्स-२).